महाराष्ट्र प्रादेशिक नगररचना अधिनियम १९६६
कलम ४९ अन्वये शासनाने कायम केलेल्या
खरेदी सूचनांच्या अनुषंगाने भूसंपादन कार्यवाही
सुरु करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग
क्रमांक : पीआरएन / टीपीएस ३५९३/१०६७/नवि-९
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२. दिनांक : १६ फेब्रुवारी १९९५.

परिपत्रक

महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम १९६६ चे कलम ४९ च्या उप कलम (४) आणि (५) अन्वये खरेदी सूचना कायम झाल्यानंतर उक्त अधिनियमाच्या कलम ४९ (७) अन्वये संबंधित प्राधिकरणाने एक वर्षाचे आत भूसंपादनासाठी अर्ज करणे आवश्यक आहे. तसेच उक्त अधिनियमाच्या कलम १५२ अन्वये कलम ४९ साठीचे नियोजन प्राधिकरणाचे अधिकार महानगर पालिका क्षेत्राकरिता. आयुक्त, महानगरपालिका आणि नगर पालिका क्षेत्राकरिता नगर परिषदेच्या मुख्याधिकाऱ्यांना व इतर विशेष नियोजन प्राधिकरणाच्या बाबतीत संबंधित अधिकाऱ्यांना देण्यात आलेले आहेत. म्हणून कलम ४९ ची खरेदी सूचना कायम झाल्यानंतर संबधित अधिकाऱ्याने कायद्यातील कलमानुसार विहित मुदतीत भूसंपादनासाठी जिल्हाधिकारी यांचेकडे प्रस्ताव पाठविणे आवश्यक आहे व त्यासाठी त्यांना जबाबदार धरण्यात येईल.

तथापि, शासनाच्या असे निदर्शनास आले आहे की, खरेदी सूचना कायम झाल्यानंतर अनेक नगरपालिकांचे मुख्याधिकारी, नगरपरिषदेच्या ठरावाशिवाय भूसंपादनाचा प्रस्ताव जिल्हाधिकारी यांचेकडे पाठविण्यास तयार नसतात. तसेच मुख्याधिकारी यांनी न.प.चा ठराव न घेता जिल्हाधिकारी यांना पाठविला तर जिल्हाधिकारी, संपादनासाठी नगरपरिषदेचा ठराव नसल्याने अशा प्रस्तावावर कार्यवाही न करता मुख्याधिकारी यांना कळवितात की त्यांनी नगरपरिषदेचा ठराव घेवून भूसंपादनाचा प्रस्ताव पाठवावा.

अशा स्थितीत, मुख्यत्वेकरुन नगरपरिषदांचे मुख्याधिकारी आणि सर्व जिल्हाधिकारी यांना कळविण्यात येते की, महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ४९ अन्वये खरेदी सूचना कायम झाल्यानंतर संबधित मुख्याधिकारी यांनी जिल्हाधिकारी यांचेकडे नगरपरिषदेच्या ठरावाची अपेक्षा न करता भूसंपादनाचा प्रस्ताव सादर करावा. आणि संबधित जिल्हाधिकारी यांनी देखील नगरपरिषदेच्या ठरावासाठी प्रस्ताव प्रलंबित न ठेवता भूसंपादनाची कार्यवाही तात्काळ सुरु करावी.

याबाबतीत शासनाच्या विधी व न्याय विभागाचा सल्ला घेण्यात आलेला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही /-
( गो. श्री. पंतबाळेकुंद्री )
उप सचिव.